जिल्हा परिषदेचे कर्मचारी व सेवानिवृत्त
कर्मचारी यांचे वेतन व सेवानिवृत्ती वेतन
दरमहिन्याच्या एक तारखेला अदा करणेबाबत

महाराष्ट्र शासन
ग्राम विकास व जलसंधारण विभाग
मंत्रालय मुंबई-३२
परिपत्रक क्र. वेतन २०११/ प्र.क्र.२९ /वित्त-१
दि. ५ मार्च २०११

वाचा: १) शासन निर्णय क्र. संकीर्ण १००६/ प्र.क्र. १३१/ कोषा प्रशा-५ दि.१५/५/०७
२) शासन निर्णय क्र. डी.डी.ओ. १००७/प्र.क्र. ६५ /कोषा-५ दि. ८/६/०७
३)परिपत्रक क्र. संकीर्ण २००९ / प्र.क्र. ३५०३ /वित्त-२ दि.३०/३/०९

प्रस्तावना :-

जिल्हा परिषदेच्या कर्मचा-यांना तसेच सेवानिवृत्त कर्मचा-यांना त्यांचे वेतन व भत्ते,सेवानिवृत्ती वेतन दर महिन्याच्या एक तारखेला जिल्हा परिषदेकडून अदा होणे बाबत आवश्यक त्या सुचना संदर्भ क्र.३ च्या परिपत्रकान्वये देण्यात आलेल्या आहेत. तथापि त्याप्रमाणे वेतन व सेवानिवृत्ती वेतन दरमहा १ तारखेला जिल्हा परिषदेकडून अदा केले जात नाही असे शासनाच्या निदर्शनास आले आहे. त्यामुळे पुन्हा एकदा सदर परिपत्रकाद्वारे सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी यांना खालील प्रमाणे सूचना देण्यात येत आहे.

परिपत्रक :-

वित्त विभागाच्या संदर्भ क्र.१ च्या शासन निर्णयातील परिच्छेद -६नुसार संगणकीय अर्थसंकल्प वितरण प्रणालीद्वारे (BDS/BEAMS) अर्थसंकल्पीय तरतूदीचे वाटप केल्यामुळे आहरण व संवितरण अधिकारी यांना प्रत्येक महिन्यात कोणत्याही प्रकारचे देयक कोणत्याही दिनांकास कोषागारात सादर करता येईल ही बाब लक्षात घेऊन वित्त विभागाच्या सदर अनुमतीनुसार सर्व मुख्य लेखा व वित्त अधिका-यांनी आपल्या जिल्हा परिषद कर्मचारी /सेवानिवृत कर्मचारी यांची वेतन व सेवानिवृत्तीवेतन देयके कोषागारास प्रत्येक महिन्याच्या २० तारखेपुर्वी सादर करावीत. वित्त विभागाच्या संदर्भ क्र.२ च्या शासन निर्णयानुसार दर महिन्याच्या देय तारखेच्या पूर्ण कामाच्या तीन दिवस आधी धनादेश कोषागारातून प्राप्त करुन घेऊन ते त्याच दिवशी जिल्हानिधीत जमा करावे व मुख्य लेखा वित्त अधिकारी यांनी तद्नंतर हा निधी रक्कम वित्त प्रेक्षणाद्वारे गटविकास अधिकारी यांचे बँक खात्यात तातडीने जमा करावा, जेणेकरुन सर्व जिल्हा परिषद कर्मचारी तसेच सेवानिवृत्त कर्मचारी यांना दरमहा एक तारखेला वेतन /सेवानिवृत्ती वेतन मिळणे शक्य होईल.

सदर सूचनांचे सर्व मुख्य लेखा व वित्त अधिकारी यांनी कटाक्षाने पालन करावे. तसेच याप्रकरणी कोणतीही तक्रार उदभवणार नाही, याची दक्षता घेण्याची संपूर्णत: जबाबदारी मुख्य कार्यकारी अधिकारी यांची राहील याची कृपया नोंद घ्यावी.

(व.दा.राठोड)
उपसचिव महाराष्ट्र शासन

प्रत,

सर्व विभागीय आयुक्त
सर्व कोषागार अधिकारी
सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी , जिल्हा परिषद /सर्व मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद
सर्व उपमुख्य कार्यकारी अधिकारी (सामान्य)/सर्व शिक्षण अधिकारी (प्रा). जिल्हा परिषद